

"प्रथम देशाचा विचार." आयुष्यभर इंदिरा गांधींनी हा मंत्र मनात जपला.

कित्येक वर्षे भारतावर ग्रेट ब्रिटनने राज्य केले. भारतीय लोक या राज्यकर्त्यांना कंटाळले होते. त्यांना स्वातंत्र्य, स्वराज्य आणि स्वशासन हवे होते.

इंदिराचे आजोबा, *मोतीलाल नेहरू* यांनी भारताच्या स्वातंत्र्यासाठी संघर्ष केला. इंदिराचे पिता *जवाहरलाल नेहरू* आणि आई *कमला नेहरू* यांनीदेखील स्वातंत्र्यसंग्रामात सहभाग घेतला. स्वातंत्र्यसंग्रामातील आणखी एका महान नेत्याचा उल्लेख इथे करायला हवा. *मोहनदास करमचंद गांधी.*



इंदिराचे पिता जवाहरलाल नेहरू भारताचे पहिले पंतप्रधान होते. ते 1947 ते 1964 पर्यंत पंतप्रधानपदावर राहिले. त्यांनी मोहनदास गांधींच्या तत्वांचे समर्थन केले.

मोहनदास गांधी हे नेहरू कुटुंबाचे जवळचे मित्र होते. ते भारताचेही एक चांगले मित्र होते, असे म्हणता येईल. धैर्य, सत्य आणि अहिंसा या तत्वांचे पालन केल्यास भारत ग्रेट ब्रिटनच्या जोखडातून मुक्त होऊ शकेल, यावर त्यांचा ठाम विश्वास होता.



आई कमला आणि पिता जवाहरलाल यांच्यासह लहानगी इंदिरा.

इंदिराचा जन्म 19 नोव्हेंबर 1917 रोजी अलाहाबाद शहरात तिच्या आजोबांच्या घरी झाला. तिच्या आजोबांच्या घराचे नाव होते “आनंद भवन”.

पण त्या घरात इंदिराने सदोदीत आनंदाचेच क्षण उपभोगले, असे काही नव्हते. तिच्या कुटुंबियांचे तिच्यावर खूप प्रेम होते. पण ते बराच काळ राजकारणात व्यस्त असत. त्यामुळे इंदिराला कधीकधी एकाकी वाटत असे.

स्वातंत्र्यासंग्रामात भाग घेतल्यामुळे तिच्या कुटुंबियांना अनेकदा तरुंगात जावे लागे. तिचे आई-वडील, आजी-आजोबा, काका-काकी या सगळ्यांना तुरुंगात दिवस काढावे लागले. त्या काळात इंदिराला उदास वाटत असे.

इंदिरालासुद्धा भारताच्या स्वातंत्र्यासाठी काही करायचे होते. ती लहान होती तेव्हा बागेतील एका मेजावर उभी राहून भाषण करत असे. त्यांच्या घरातील नोकर-चाकर आणि त्यांची मुले तिच्या भाषणाचे श्रोते बनत.



गांधी भारताचे नायक होते. लोक त्यांना महात्मा म्हणत. महात्मा म्हणजे “महान आत्मा”.

एकदा मोहनदास गांधी म्हणाले की भारतीयांनी फक्त भारतीय वस्तूच वापरायला हव्यात. इंदिराच्या कुटुंबियांना हा विचार पटला. त्यांनी आपल्या घरातील सर्व ब्रिटिश वस्तू जाळून टाकल्या. इंदिराने आपल्या बाहुलीकडे पाहिले. तिला ही बाहुली खूप प्रिय होती. पण बाहुली ब्रिटिश होती. म्हणून इंदिराने ती जाळून टाकली.

इंदिराचे पिता आणि आजोबा यांनी *भारतीय राष्ट्रीय काँग्रेस* या राजकीय संघटनेचे नेतृत्त्व केले. इंदिरा अकरा वर्षांची होती तेव्हा तिला या काँग्रेसमध्ये सहभागी व्हायचे होते.

“अजिबात नाही,” इंदिराला परवानगी मिळाली नाही, “तुला अठरा वर्षांची होईपर्यंत वाट पाहावी लागेल.”

मग इंदिराने मुलांचा एक गट सुरू केला. त्याचे नाव होते “ब्रिगेड”. त्यात एक हजारापेक्षा जास्त मुलांनी सहभाग घेतला. त्यांनी निरोपांची देवाण-घेवाण करून काँग्रेस संघटनेला मदत केली.

इंदिरा अनेक वेगवेगळ्या शाळांमध्ये शिकली. काही काळ ती स्वित्झर्लंडमध्येही शिकली. तिला पुस्तके आवडत असत. तिच्या वडिलांनी तिच्या आवडीची भरपूर पुस्तके तिला दिली. 1934 साली इंदिरा *विश्वभारती* नावाच्या एका विशेष विद्यापीठात शिकायला गेली. तिथे तिने निसर्ग आणि भारतीय कला यांबद्दल शिक्षण घेतले. हा इंदिराच्या आयुष्यातील एक सुखद काळ होता.

परंतु 1935 साली तिला ही शाळा सोडावी लागली. तिची आई क्षय रोगाने आजारी पडली होती आणि तिचे वडील तुरुंगात होते. म्हणून मग इंदिरा तिच्या आईला घेऊन स्वित्झर्लंडच्या डॉक्टरांकडे गेली. तिथे 1936 साली कमला नेहरूंचे निधन झाले.



ऑक्सफर्ड विद्यापीठ

त्यानंतर इंदिरा इंग्लंडला गेली. ती ऑक्सफर्ड विद्यापीठाच्या सोमरविले कॉलेजमध्ये शिकली. ती पुन्हा आनंदी दिसू लागली. कधीकधी तिला घरची खूप आठवण येत असे. भारतात बरेच काम करायचे बाकी आहे, याची तिला सतत जाणीव असे.



मग दुसरे महायुद्ध सुरू झाले. इंदिराने काही काळ ब्रिटिश रेड-क्रॉस संघटनेच्या रुग्णवाहिकेची ड्रायव्हर म्हणून काम केले. पण 1941 साली ती भारतात परतली. तिच्यासोबत फिरोझ गांधी नावाचा तरूण होता. त्याचे मोहनदास गांधींशी काही नाते नव्हते. पण तो नेहरू कुटुंबाचा चांगला मित्र होता.



इंदिरा गांधी आपला मुलगा आणि राजकीय वारस राजीवसोबत गप्पा मारत आहेत.

इंदिराने आपल्या वडिलांकडे फिरोझशी लग्न करण्याची इच्छा व्यक्त केली. प्रथम वडील या लग्नाला अनुकूल नव्हते. पण नंतर त्यांचे मन पालटले. 26 मार्च 1942 रोजी इंदिरा आणि फिरोझचे लग्न झाले. 1944 साली त्यांना पहिले अपत्य झाले. त्याचे नाव त्यांनी राजीव ठेवले. 1946 साली त्यांच्या दुसऱ्या मुलाचा, संजयचा जन्म झाला. दरम्यान इंदिरा आणि फिरोझ हे दोघेही भारताच्या स्वातंत्र्यसंग्रामात सहभागी झाले.

संयुक्त राष्ट्रातील भारताचे प्रतिनिधी डॉ. पी.पी.पिल्ले यांनी न्यूयॉर्कमध्ये संयुक्त राष्ट्र मुख्यालयात स्वतंत्र भारताचा झेंडा फडकवला.







(डावीकडे) इंदिराने पित्यासोबत अनेक राजकीय बैठकांमध्ये भाग घेतला. (उजवीकडे) पंतप्रधान नेहरू सैनिकांचे परिक्षण करताना.

अखेरीस, 1947 साली भारत स्वतंत्र झाला. देशात असंख्य अडचणी होत्या. भारताला काही युद्धांना तोंड द्यावे लागले. देशातल्या देशातच लोकांमध्ये काही संघर्ष होते. भारतात गरिबी मोठ्या प्रमाणात होती. पण आता भारताकडे एक सक्षम पंतप्रधान होते – इंदिराचे पिता, जवाहरलाल नेहरू.

पित्याला आपल्या मदतीची आवश्यकता आहे, हे इंदिराला जाणवले. तिने त्यांना शक्य ती मदत केली. शेवटी ती आपल्या मुलांना घेऊन पित्याकडेच राहायला आली. फिरोझ तसेच त्यांच्या वैवाहिक आयुष्यासाठी हे अनुकूल नव्हते. पण इंदिराने नेहमी आपल्या देशाला प्राधान्य दिले.

इंदिराने पित्यासोबत जगभर प्रवास केला. त्यामुळे तिला त्यांच्या अडचणी कळल्या. तिने त्यांना सहभोजनाचे कार्यक्रम आयोजीत करण्यास मदत केली. हे करताना ती त्यांच्याकडून राजकारणाबद्दल शिकत गेली.

1955 साली काँग्रेस पक्षाने इंदिराला आपल्या समितीत सदस्य करून घेतले. 1959 साली इंदिराला पक्षाचा अध्यक्ष बनवण्यात आले. काही लोकांना इंदिरा कमजोर वाटत होती. पण त्यांचा अंदाज चुकला. पक्षातील काम न करणाऱ्या लोकांना इंदिराने पक्षातून काढून टाकले. तिने पक्ष सदस्यांना एकजूटीने काम करण्यास प्रोत्साहीत केले.



1965 साली इंडोनेशियाच्या बांडुंग शहरात झालेल्या आफ्रो-आशियाई संमेलनात नेहरू आणि इंदिराने भाग घेतला.



1966 साली श्रीमती इंदिरा गांधी यांनी न्यूयॉर्क राज्याचा दौरा केला आणि गव्हर्नर नेल्सन रॉकफेलर (उजवीकडे) यांची भेट घेतली.

पण जवाहरलाल नेहरू थकत चालले होते. त्यांना आता इंदिराची जास्त गरज वाटू लागली. पित्याला अधिकाधिक वेळ देण्यासाठी इंदिराने वर्षभरानंतर पक्षाध्यक्षपदाचा राजीनामा दिला.

1964 साली जवाहरलाल यांना हृदयविकार झाला. इंदिरा त्यांची नर्स बनली. तिने देश चालवण्यासाठी त्यांना मदत केली. पण काही महिन्यांनंतर जवाहरलाल यांचे निधन झाले.



लाल बहादूर शास्त्री यांच्या निधनानंतर इंदिरा गांधी पंतप्रधान तसेच देशाच्या सर्वात मोठ्या राजकीय पक्षाची प्रमुख बनली.

यानंतर लाल बहादुर शास्त्री हे भारताचे पंतप्रधान बनले. त्यांनी इंदिराला सरकारमध्ये सहभागी होण्याबद्दल विचारले. इंदिराने माहिती आणि प्रसारण मंत्री बनण्याची इच्छा व्यक्त केली. पण दीर्घ काळपर्यंत तिला ते पद मिळाले नाही.

1966 साली शास्त्रीजींचे निधन झाले. सरकारमधील नेत्यांना एका नव्या पंतप्रधानाची निवड करायची होती. लवकरच त्यांनी अशी व्यक्ती निवडली – इंदिरा गांधी.





भारताला समर्थन मिळण्यासाठी इंदिराने जगातील प्रमुख राजकीय नेत्यांची भेट घेतली. (डावीकडे) ब्रिटिश परराष्ट्र सचिव अलेक डग्लस-ह्यूम आणि (उजवीकडे) अमेरिकेचे अध्यक्ष रिचर्ड निक्सन.

अचानक इंदिरा कोट्यवधी लोकांची राज्यकर्ता बनली. काहींनी तिला जगातील सर्वात प्रभावी स्त्री म्हटले. पण काहींनी इंदिरा एवढ्या उच्च पदासाठी योग्य आहे का, अशी शंका व्यक्त केली.

लवकरच इंदिराने आपला कणखरपणा दाखवून दिला. तिने भारताच्या आर्थिक समस्यांवर काम केले. तिने बांग्लादेश हा नवा देश स्थापन होण्यात मदत केली. तिने कित्येक राजकीय लढाया जिंकल्या. जगावर भारताची छाप उमटवण्याचा प्रयत्न तिने केला.





1980 च्या दशकात चीनचे उपाध्यक्ष आणि परराष्ट्र मंत्री हुआंग हुआ (डावीकडे) आणि अमेरिकेचे अध्यक्ष रोनाल्ड रिगन (उजवीकडे) श्रीमती गांधी यांच्यासमवेत जागतिक घटनांवर चर्चा करताना.

1975 साली इंदिरा एका अडचणीत सापडली. एका कोर्टाने सांगितले की तिने मागची निवडणुक निष्पक्षपणे जिंकली नाही. इतर पक्षांच्या नेत्यांनी इंदिराला पंतप्रधानपदाचा राजीनामा देण्यास सांगितले. पण इंदिराने तसे न करता विरोध करणाऱ्या लोकांना तुरुंगात डांबले आणि देशात आणीबाणी घोषीत केली. इंदिराचा हा निर्णय अनेकांना पटला नाही.



आपल्या विरोधकांना हरवण्यासाठी इंदिरा गांधी यांनी शक्य तितके प्रयत्न केले. त्या नेहमीच जिंकल्या नाहीत. परंतु त्या नेहमीच आपल्या तत्वांसाठी झगडल्या. त्यामुळे त्यांना अनेक शत्रू निर्माण झाले.

1977 साली इंदिरा निवडणूक हरली. ज्या लोकांना तिने तुरुंगात टाकले होते त्यांतीलच एक पंतप्रधान बनले. आता इंदिरावर तुरुंगात जाण्याची पाळी आली. ती दोन वेळा तुरुंगात गेली.

1980 साली तिने पुन्हा निवडणूक लढवली. यावेळी ती जिंकली आणि दुसऱ्यांदा पंतप्रधान बनली. संपूर्ण देशच तिच्या पाठीशी उभा राहिला आहे, असे वाटू लागले. लोक तिला मॅडम किंवा अम्मा (आई) म्हणू लागले.



1980 साली एका विमान अपघातात इंदिरा गांधी यांचा धाकटा मुलगा संजय याचा मृत्यू झाला.

परंतु 1980 हे वर्ष इंदिरासाठी दु:खद काळ ठरला. त्यांचा धाकटा मुलगा संजय याचा विमान अपघातात मृत्यू झाला. या कठीण काळातही इंदिराने काम करणे बंद केले नाही. तिने नेहमीच देशाला प्राधान्य दिले.



अमृतसर (पंजाब) येथील सुवर्णमंदिर

भारतातील एक समूह आपला वेगळा देश बनवू इच्छित होता. ते शीख धर्माचे अनुयायी होते. त्यांतील काही लोकांनी सुवर्ण मंदिरालाच आपला गड बनवले. आपल्या योजनेला पाठींबा द्यावा यासाठी ते इतर लोकांवर दबाव आणू लागले.

इंदिराला हा राजकीय संघर्ष संपवण्याची गरज वाटू लागली. तिने लष्कराला सुवर्ण मंदिरात शिरण्याचा आदेश दिला. या संघर्षात अनेक शीख लोक आणि सैनिक मारले गेले.





इंदिरा गांधी यांच्यावर अंतिम संस्कार करण्याआधी त्यांचे पार्थिव राजधानी दिल्लीच्या रस्त्यांवरून नेण्यात आले.

सुवर्ण मंदिरातील कारवाईमुळे शीख बांधव दुखावतील, अशी शंकासुद्धा इंदिराच्या मनात आली नाही. तिने तिचे शीख संरक्षकसुद्धा कायम ठेवले. पण ती कारवाई शांतता प्रस्थापित होण्याच्या दृष्टिने उपयोगी ठरली नाही.

31 ऑक्टोबर 1984 रोजी इंदिरा आपल्या बागेतून जात होती. तिने आपल्या दोन शीख संरक्षकांना हॅलो म्हटले.





श्रीमती गांधी यांच्या हत्येनंतर दंगे उसळले. असंख्य शीख लोकांवर हल्ले झाले. त्यांची घरे व व्यवसाय जाळण्यात आले. शांती प्रस्थापित करण्यासाठी लष्कराची मदत घेण्यात आली.

त्यांपैकी एकाला तर इंदिरा गेली अनेक वर्षे ओळखत होती. तिचा त्यांच्यावर पूर्ण विश्वास होता.

पण त्या संरक्षकांना सुवर्ण मंदिरातील कारवाईचा सूड उगवायचा होता. त्यामुळे त्यांनी इंदिरावर गोळ्या झाडल्या.

इंदिराच्या मृत्युची खबर पसरताच दंगे सुरू झाले. असंख्य शीख लोक त्यात मारले गेले. दंगेखोरांनी त्यांची घरे जाळली.



(वर) इंदिरा गांधी यांच्यावर अंतिम संस्कार होताना. (खाली) भारतीय लोकांनी श्रीमती गांधी यांच्या अंतिम संस्कारावेळी मोर्चा काढला.





(डावीकडे) राष्ट्रपती झैलसिंग राजीव गांधी यांना पंतप्रधानपदाची शपथ देताना.



इंदिराचा मुलगा राजीव भारताचे नवे पंतप्रधान बनले. त्यांनी लोकांना दंगे बंद करण्याचे आवाहन केले. दंगे भारतासाठी कधीही फलदायी नव्हते. अशावेळी आई “प्रथम देशाचा विचार” असे म्हणाली असती, हे राजीव यांना जाणवले.

# इंदिरा गांधी

| | |
|---|---|
| 1917 | 19 नोव्हेंबर – उत्तर भारतातील अलाहाबाद शहरात जन्म. जवाहरलाल आणि कमला नेहरू यांचे एकमेव अपत्य. |
| 1934-35 | भारतातील विश्वभारती विद्यापीठात शिक्षण. |
| 1936 | ऑक्सफर्ड विद्यापीठाच्या सोमरविले कॉलेजात प्रवेश. |
| 1941 | इंग्लंडवरून भारतात परतली. |
| 1942 | फिरोझ गांधीशी लग्न. |
| 1947 | स्वतंत्र भारताचे पहिले पंतप्रधान व तिचे पिता यांच्या कामात मदत. |
| 1955 | काँग्रेस पक्षाच्या प्रशासनिक समितीत सदस्य. |
| 1959 | काँग्रेस पक्षाची अध्यक्ष म्हणून निवड |
| 1960 | पित्याला मदत करण्यासाठी पक्षाध्यक्षपद सोडले. |
| 1964 | माहिती आणि प्रसारण मंत्री बनली. |
| 1966 | भारताची पंतप्रधान बनली. |
| 1977 | निवडणुक हरली. |
| 1960 | पंतप्रधान म्हणून पुन्हा निवड. |
| 1981 | 31 ऑक्टोबर रोजी शीख संरक्षकांकडून हत्या. |

**समाप्त**